**कोल्हापूर व सांगली जिल्हयांतील गंभीर पूर परिस्थितीमुळे बाधित व्यक्तिंना सुरक्षित स्थळी स्थलांतरीत करणे व त्यांना जिवनावश्यक वस्तुंचा पुरवठा करण्यासाठी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी आवश्यक बाबी पाठविण्यासंदर्भात केलेल्या वाहतूक खर्चास परवानगी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (आपत्ती व्यवस्थापन (मदत व पुनर्वसन))**
**शासन निर्णय क्रमांक :- आव्यप्र-२०१९/प्र.क्र.७९/आव्यप्र-१,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
दिनांक :- १६ नोव्हेंबर, २०१९.

**प्रस्तावना :**

राज्यामध्ये यावर्षी ऑगस्ट महिन्याच्या पहिल्या आठवड्यात झालेल्या पर्जन्यवृष्टीमुळे १० जिल्ह्यांमध्ये अतिशय गंभीर पूर परिस्थिती निर्माण झाली. त्या जिल्ह्यांपैकी “कोल्हापूर आणि सांगली” या जिल्ह्यातील परिस्थिती अतिशय गंभीर होती. या दोन जिल्ह्यातील साधारणत: ३१० गावे व शहरे पूर्णतः पूराच्या पाण्याने वेढले गेले होते. अशा परिस्थितीत पूरात अडकलेल्या तेथील बाधित नागरिकांना सुखरुप बाहेर काढून सुरक्षित ठिकाणी पोचवणे, हे प्रशासनासमोर अत्यंत महत्वाचे काम होते.

सदर पूरपरिस्थितीचा यशस्वीपणे सामना करण्यासाठी शासन स्तरावर “आपत्ती व्यवस्थापन प्रभागामार्फत” २४ तास कामकाज सुरू होते. पूरात अडकलेल्या नागरिकांचा बचाव करण्यासाठी, देशातील मदत करणाऱ्या विविध प्राधिकरणांशी संपर्क करून त्यांना तातडीने या दोन जिल्ह्यात (कोल्हापूर व सांगली) पाचारण करणे, हे महत्त्वाचे काम आपत्ती व्यवस्थापन प्रभागामार्फत सुरु होते. संबंधित प्राधिकरण जसे NDRF (राष्ट्रीय आपत्ती बचाव पथक), SDRF (राज्य आपत्ती बचाव पथक), कोस्टगार्ड, नेव्ही (नौदल), AIR FORCE (हवाईदल) यांना ग्रीन कॉरिडोर देऊन नियोजित स्थळी तात्काळ पोहचण्यासाठी संपर्क साधण्याचे कामकाज सुरु होते. तसेच पूरात अडकलेल्या संबंधित विस्थापित नागरिकांना जिवनावश्यक वस्तू तातडीने पुरवण्याबाबतच्या सूचना या प्रभागातून देण्यात येत होत्या. सदर कालावधीमध्ये एकूण ३१० गावामधील ६.५० लक्ष बाधितांना सुरक्षित ठिकाणी हलविण्यात आले.

मुंबई शहरातून सदर जिवनावश्यक वस्तूंचा पुरवठा नियोजित स्थळी पोहोचण्यासाठी “जिल्हाधिकारी-मुंबई उपनगर” यांना कळविण्यात आले होते. त्यानुसार “जिल्हाधिकारी-मुंबई उपनगर” या कार्यालयाने वाहतूकीची सोय करण्यासाठी एस इंटरनॅशनल ट्रॅव्हल्स वाहतूकदारास कळविले. जिल्ह्यांमधील पूरपरिस्थतीचा विचार करुन बाधितांपर्यंत तातडीने मदत पोहचविण्यासाठीची (NDRF, SDRF, COAST GUARD, NAVY, AIR FORCE, जिवनावश्यक वस्तू) वाहतूकदारास विनंती केली.

त्यासाठी झालेल्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

ऑगस्ट महिन्यात राज्यांमध्ये झालेल्या अतिवृष्टीमुळे सांगली व कोल्हापूर जिल्हयांत गंभीर पूर परिस्थिती निर्माण झाली. त्यावेळेस गंभीर पूर परिस्थितीचा सामना करण्यासाठी पूरबाधीत जिल्हयांतील व्यक्तींना सुरक्षित स्थळी स्थलांतरीत करणे तसेच त्या व्यक्तींना जिवनावश्यक वस्तुंचा पुरवठा करणे अत्यंत गरजेचे होते. पूरबाधित व्यक्तींना सुरक्षित स्थळी पोहचविण्यासाठी NDRF, SDRF, COAST GUARD, NAVY, AIR FORCE च्या तुकडयांना तातडीने त्या जिल्हयांत पाठविणे आवश्यक होते. या तुकडया मुंबईहून नियोजित ठिकाणी पाठविण्यासाठी जिल्हाधिकारी मुंबई उपनगर यांनी एस इंटरनॅशनल ट्रॅव्हल्स यांच्याकडून वाहतूक व्यवस्था करण्यासाठी झालेल्या रु. ४६,०५,००० /- ( रुपये सेहेचाळीस लक्ष पाच हजार) च्या खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर देयक अदा करण्यासाठी रु. ४६,०५,००० /- ( रुपये सेहेचाळीस लक्ष पाच हजार) लेखाशिर्ष (२२४५- २२४७) मध्ये तरतूद पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन व ती रक्कम जिल्हाधिकारी मुंबई उपनगर यांना विभागीय आयुक्त कोकण यांच्यामार्फत वितरित करण्याबाबची कार्यवाही म-११ कार्यासनाने करावी.

सदर आदेश वित्त विभागाच्या आणि उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांच्या सहमतीने त्यांनी दिलेल्या अनौपचारिक संदर्भ अनुक्रमे ३९०/२०१९/व्यय-९, दि. ०७.१०.२०१९ हे व अनौपचारिक संदर्भ क्र. ५२/उद्योग-४, दि. ०७.११.२०१९.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१९१११६१२००४१२९१९ असा आहे. सदरचे आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SHRIRANG SHRIPATI GHOLAP

Digitally signed by SHRIRANG SHRIPATI GHOLAP
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9a2bc3b45be4b89f7c46c4474cf90b8a3c477e34c064494b04238ca50ee43db6, postalCode=400032, street=1ST FLOOR MAIN ROAD, MANTRALAYA, ou=REVENUE AND FOREST DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SHRIRANG SHRIPATI GHOLAP
Date: 2019.11.16 12:04:51 +05'30'

**( श्रीरंग घोलप )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, कोकण
२. जिल्हाधिकारी मुंबई उपनगर
३. महालेखाकार (महाराष्ट्र-१) मुंबई
४. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
५. कक्ष अधिकारी, कार्यासन म-११
६. वित्तीय सल्लागार व सह सचिव,आपत्ती व्यवस्थापन प्रभाग,मंत्रालय, मुंबई
७. लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती आव्यप्र-१